**श्रीमती भाग्यश्री मग्गीरवार, उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांची उपसंचालक, विशेष सनियंत्रण कक्ष, जलस्वराज्य टप्पा-२ या पदावरील प्रतिनियुक्ती.**

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन आदेश क्रमांकः आपना-०२१८/प्र.क्र.७२/पापु-१५

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय इमारत, मुंबई ४०० ००१.
तारीख: ०८ ऑगस्ट, २०१८.

<u>वाचा :-</u>

१) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः** एसआरव्ही-०२११/प्र.क्र.१३७/कार्यासन १२, दिनांक १७/१२/२०१६

२) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः** एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/कार्या.१२, दिनांक १६/०२/२०१८

३) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः** आस्था-२०१७/प्र.क्र.०८/पापु-०१ (आस्था), दिनांक १०/१०/२०१७

<u>प्रस्तावना :-</u>

राज्य शासनाच्या विविध विभागात/ विभागाच्या अधिपत्याखालील मंडळे/ महामंडळे यामधील विविध पदांवर सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ व २ येथील शासन निर्णयातील तरतुदीनुसार प्रतिनियुक्तीने नियुक्त्या केल्या जातात.

पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या अधिपत्याखालील कार्यालयांमध्ये प्रतिनियुक्तीच्या पदावर नियुक्ती देण्यासाठी सक्षम प्राधिकारी यांना शिफारस करण्याकरिता अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांच्या अध्यक्षतेखाली संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये समिती गठीत करण्यात आली आहे.

या समितीने केलेल्या शिफारशीनुसार व सक्षम प्राधिकारी यांनी दिलेल्या मान्यतेनुसार या विभागाच्या अधिपत्याखालील जलस्वराज्य टप्पा-२ मधील कार्यालयामधील उपसंचालक, विशेष सनियंत्रण कक्ष या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन आदेश:-

श्रीमती भाग्यश्री चंद्रकांत मग्गीरवार, उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांच्या सेवा जलस्वराज्य टप्पा-२ प्रकल्पाकरिता उपसंचालक, विशेष सनियंत्रण कक्ष, जलस्वराज्य टप्पा-२ या पदावर प्रतिनियुक्तीने तीन वर्षांच्या कालावधीसाठी किंवा प्रकल्प संपुष्टात येईल त्या वर्षापर्यंत (या पैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीकरीता) खालील अटींच्या अधीन राहून सुपूर्द करण्यात येत आहेत :-

## अटी :-

१) श्रीमती मग्गीरवार ज्या तारखेला प्रतीनियुक्तीच्या पदावर रुजू होतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल. त्यानंतर तीन वर्षांनी प्रतिनियुक्तीच्या पदाचा कार्यभार सुपूर्द करून त्यांच्या मूळ विभागात ज्या तारखेला त्या रुजू होतील त्या तारखेला त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी समाप्त होईल.

२) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर, प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/ सक्षम प्राधिकारी राखून ठेवत आहे.

३) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही, तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेतर नियोक्त्याने शासनाला/ सक्षम प्राधिकारी यांना तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

४) श्रीमती मग्गीरवार, उपसंचालक यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे, अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/ सक्षम प्राधिकारी यांना दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा...... इत्यादी) नियम, १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट- दोन) मधील तरतुदी विचारात घेऊन संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा तसेच प्रकल्प संचालक, जलस्वराज्य टप्पा-२ यांनी प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्थी, आपापसात सल्लामसलत करून ठरवाव्यात.

श्रीमती भाग्यश्री चंद्रकात मग्गीरवार यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागामार्फत हाताळण्यात येतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201808081117214228 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WSSD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2018.08.08 11:34:27 +05'30'

**(चेतन निकम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

श्रीमती भाग्यश्री चंद्रकात मग्गीरवार, उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (संचालनालयामार्फत)

**प्रत :-**

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१.
४. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, भूजल भवन, शिवाजीनगर, पुणे.
५. उपसचिव तथा प्रकल्प संचालक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१.
६. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व कार्यासने.
७. निवडनस्ती, कार्यासन, पापु-१५.